महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,मंत्रालय मुख्य इमारत, पहिला मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दुरध्वनी क्र. ०२२-२२०४८२४७ Email ID : dokh.rfd@maharashtra.gov.in

---

क्रमांक: गौखनि-३८/०२२२/प्र.क्र.१२/ख-१ दिनांक:- १६ एप्रिल, २०२४

**प्रति,**

**जिल्हाधिकारी,**
**कोल्हापूर.**

**विषय:- <u>गौण खनिज-कोल्हापूर</u>**
सन २०१६-१७ करीता कृष्णा नदीपात्रातील मौजे औरवाड, ता.शिरोळ, (वाळूगट क्र.११२, ११४) या वाळू गटामधून उत्खनन न करता आलेल्या वाळूची प्रमाणशीर रक्कम परत करणेबाबत.
श्री.रफतसरोश जफरअली पटेल

**शासन ज्ञापन:**

कोल्हापूर जिल्ह्यात सन २०१६-१७ या वर्षाकरीता घेण्यात आलेल्या लिलावात सन २०१६-१७ करीता कृष्णा नदीपात्रातील मौजे औरवाड, ता.शिरोळ, (वाळूगट क्र.११२, ११४) हा वाळूगट १३२५ ब्रास वाळूसाठ्याच्या परिमाणाकरीता लिलावधारक श्री.रफतसरोश जफरअली पटेल यांना रु.३८,०९,५००/- एवढ्या सर्वोच्च बोलीस मंजूर करण्यात आला होता. लिलावधारकाने लिलावाच्या सर्वोच्च बोलीच्या रकमा शासनजमा केल्यानंतर लिलावधारकास वाळूगटाचा ताबा देण्यात आला.

०२. तथापि, मा. राष्ट्रीय हरीत न्यायाधिकरण, नवी दिल्ली येथे दाखल झालेल्या मूळ अर्ज क्र.३६१/२०१५ व ३६६/२०१५ ते ३६८/२०१५ मधील दि. १९.०४.२०१७ चे आदेशाच्या अनुषंगाने शासनपत्र दि.२१.०४.२०१७ अन्वये प्राप्त सुचनेनुसार सक्शन पंपाद्वारे सुरू असलेले वाळू उत्खनन बंद करणेबाबत कळविण्यात आले.त्यानुसार सदर वाळूगटातील यांत्रिक बोटीने वाळू उपसा बंद करण्यात आला असल्याचे तसेच यांत्रिक बोटी नदीपात्रातून बाहेर काढण्यात आला असल्याबाबतचा स्थळपाहणी पंचनामा दि.२२.०४.२०१७ रोजी मंडळ अधिकारी, नृसिंहवाडी यांनी पंचासमक्ष केला आहे. तहसिलदार शिरोळ यांच्या अहवालानुसार वाळू गटातील उत्खननाकरीता संबंधीत लिलावधारक यांना वाळू गटाचा ताबा/कब्जा परत देण्यात आलेला नाही.

०३. सबब, सदर प्रकरणी जिल्हासमितीने घेतलेला निर्णय विचारात घेता सन २०१६-१७ करीता कृष्णा नदीपात्रातील मौजे औरवाड, ता.शिरोळ, (वाळूगट क्र.११२, ११४) या वाळू गटातून मंजूर वाळूपैकी उत्खनन न करता आलेल्या वाळूची प्रमाणशीर रक्कम रु.२६,६५,१२५/- (रुपये सव्वीस लाख पाशष्ठ हजार एकशे पंचवीस फक्त) लिलावधारकास परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

०४. लिलावधारक श्री.रफतसरोश जफरअली पटेल यांनी लिलावाची संपूर्ण रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर रु.२६,६५,१२५/- (रुपये सव्वीस लाख पाशष्ठ हजार एकशे पंचवीस फक्त) इतकी रक्कम लिलावधारक यांना अदा करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०५.** या बाबीवर होणारा खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२-खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन,९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

**०६.** सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.०८.०८.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०४१८११५७२१७७१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2024.04.18 12:09:16 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**जिल्हाधिकारी, कोल्हापूर**

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, पुणे.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) निवडनस्ती